**कोषागारात रोख रकमेत देय**

**केंद्र सहाय्यीत योजनांतर्गत शौचालय बांधणे**
**सन २०११-१२ करिता राज्य हिश्श्याच्या**
**अनुदानाचे वितरण (स्टेटपूल) (२२१५ २१८९)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय : अनुदान २०११ /प्र.क्र. १३९ /पापु १६**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,दिनांक: १८नोव्हेंबर,२०११.**

**प्रस्तावना:**

सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षाकरीता केंद्र पुरस्कृत संपूर्ण स्वच्छता कार्यक्रमाच्या राज्य हिश्श्यासाठी (शौचालय बांधकाम) स्टेटपूल खाली रु.२००.०० लाखाचा अर्थसंकल्प विधीमंडळास मंजूरीसाठी सादर करण्यात आला होता. सन २०११-१२ च्या अर्थसंकल्पावर मागणीनिहाय चर्चा होवून ." महाराष्ट्र विनीयोजन विधेयक २०११" मंजूर केलेल आहे. ( महाराष्ट्र विनियोजन ( लेखानुदान ) अधिनियम,२०११ यांच्या अनुसूचीच्या सतंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह ) यास विधान मंडळाने मंजूरी दिलेली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे. अणि ते २०११ चा अधिनियम क्र.१७ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग ८, दि. २१ एप्रिल,२०११ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. त्यामुळे वित्त विभागाच्या दिनांक ६ मे,२०११ च्या शासन परिपत्रकान्वये मार्च,२०११ च्या अधिवेशनात लेखानुदानाद्वारे अर्थसंकल्पित झालेली रू १५०.०० लाख तरतूद संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे मुक्त करण्यास वित्त विभागाने दि.३.११.२०११ च्या टिपणीद्वारे मान्यता दिलेली आहे.

सदर उपलब्ध निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षाकरीता केंद्र पुरस्कृत संपूर्ण स्वच्छता कार्यक्रमाच्या राज्य हिश्श्यासाठी (शौचालय बांधकाम ) स्टेटपूल खाली रु. २००.०० लाख तरतूदीपैकी रु. १५०.०० लाख इतके अनुदान मासिक संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे नोव्हेंबर २०११ या महिन्यात उपलब्ध झाल्याने रु. १५०.०० (रु. एक कोटी पंन्नास लाख फक्त ) इतके अनुदान सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांना माहे नोव्हेंबर, २०११ मध्ये संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे रोख स्वरुपात मुक्त करण्यात येत आहे.

२. हा खर्च मागणी क्रमांक "वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता ०२, जलनिस्सारण व स्वच्छता-१०७ मलप्रणाली सेवा- ग्रामीण स्वच्छता ग्रामसफाई कार्यक्रमांतर्गत अर्थसहाय्य (राज्यपुरस्कृत योजना )- (०२) (०५) केंद्र सहाय्यीत योजनेंतर्गत शौचालय बांधणे (राज्य हिस्सा) (२२१५ २१८९) ३३ अर्थसहाय्य " या लेखाशिर्षाखाली घालावा.

३. या शासन निर्णयाखालील अनुदान पुढील अटीवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाव्दारे मंजूर केलेले अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावे. मात्र संपुर्ण स्वच्छता कार्यक्रमाखालील जिल्हा परिषदांनी या शासन निणर्याव्दारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करून संपुर्ण स्वच्छता कार्यक्रमाच्या केंद्र शासनाने निर्देशित केल्यानुसार कालावधीत आवश्यकतेनुसार वापरावा.

ब) संबंधित जिल्हा परिषदेने या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात,आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

क) अट क्रमांक ३-अ आणि ३-ब यांची पूर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी महालेखापाल -१, मुंबई व महालेखापाल-२ नागपूर यांच्याकडे तपासणीसाठी जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी याना लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावेत.

ड) या शासन निर्णयाची पोचपावती प्रत्येक जिल्हा परिषदेने शासनास पाठवावी.

इ) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहीत नमुन्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक जिल्हा परिषदेने महिन्याच्या ५ तारखेपर्यंत पाठविण्याची दक्षता घ्यावी.

फ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या विहित करण्यात आलेल्या कार्यपध्दतीचा व शासन परिपत्र क्र. संकिर्ण १००६/प्र.क्र.१३१/ कोषा प्रशासन-५ दि. १५ मे,२००७ अन्वये प्रशासकीय विभागांना मासिक निधी वितरणाबाबत प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभागाच्या **अनौपचारिक संदर्भ क्र.४४८/अर्थसंकल्प-१८/ दि.३.११.२०११ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार मुक्त करण्यात येत आहे.**

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक संकेतांक २०१११११८०६१७५१००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

**सही/-**

**( सं.शा. कांबळे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक, पुणे,अमरावती विभाग.

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग, जळगाव, पुणे, सातारा,सांगली. उस्मानाबाद. लातूर ,वाशिम ,अमरावती, वर्धा.

३) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग, जळगाव, पुणे, सातारा,सांगली. उस्मानाबाद.लातूर, वाशिम ,अमरावती, वर्धा.

४) जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सिंधुदूर्ग, जळगाव, पुणे, सातारा,सांगली. उस्मानाबाद. लातूर ,वाशिम ,अमरावती, वर्धा.

५)जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग, जळगाव,पुणे,सातारा,सांगली. उस्मानाबाद.लातूर, वाशिम ,अमरावती, वर्धा.

६) महालेखापाल-१/२, मुंबई/नागपूर (लेक्षापरिक्षा व अनुज्ञेयता)

७) नियोजन विभाग, (का.क्र. १४४३) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

८) वित्त विभाग, (अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई

१०) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, सिंधुदूर्ग, जळगाव, पुणे, सातारा,सांगली. उस्मानाबाद.लातूर, वाशिम ,अमरावती, वर्धा.

११) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई - ४०० ०३२.

१२) कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१३) निवड नस्ती, कार्यासन क्रमांक पापु-१६.

**शासन निर्णय क्र. अनुदान २०११ /प्र.क्र.१३९ /पापु-१६, दिनांकः- १८ नोव्हेबर,२०११ सोबतचे विवरणपत्र**

(रु. लाखात)

| अ.क्र. | जिल्हा परिषद | अर्थसंकल्पिय तरतुद (राज्य हिस्सा) (स्टेटपूल) | या शासन निर्णयान्वये मुक्त तरतूद | |
|---|---|---|---|---|
| | | | अंकी | अक्षरी |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | सिंधुदूर्ग | २०.०० | १५.०० | ( रु. पंधरा लाख फक्त ) |
| २. | जळगाव | २०.०० | १५०० | ( रु. पंधरा लाख फक्त ) |
| ३. | पुणे | १३.३४ | १०.०० | ( रु. दहा लाख फक्त ) |
| ४. | सातारा | १५.०० | ११.२५ | ( रु. अकरा लाख पंचवीस हजार फक्त ) |
| ५. | सांगली | १५.०० | ११.२५ | ( रु. अकरा लाख पंचवीस हजार फक्त ) |
| ६. | उस्मानाबाद | २०.०० | १५.०० | ( रु. पंधरा लाख फक्त ) |
| ७. | लातूर | ३०.०० | २२.५० | ( रु.बावीस लाख पंन्नास हजार फक्त ) |
| ८. | वाशिम | २६.६६ | २०.०० | ( रु. वीस लाख फक्त ) |
| ९. | अमरावती | २०.०० | १५.०० | ( रु. पंधरा लाख फक्त ) |
| १०. | वर्धा | २०.०० | १५.०० | ( रु. पंधरा लाख फक्त ) |
| | **एकूण** | **२००.००** | **१५०.००** | **(रु. एक कोटी पंन्नास लाख फक्त )** |

**सही /-**

**( सं.शा. कांबळे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**